कोयना प्रकल्प रुग्णालय अलोरे, ता.चिपळूण, जिल्हा-रत्नागिरी व कोयनानगर, तालुका पाटण जिल्हा-सातारा या रुग्णालयांचा डोंगरी(दुर्गम) भागातील आरोग्य संस्थात समावेश होणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१७ / प्रक्र-१८४/ आरोग्य३ (अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला, ए विंग
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २२ मे,२०१७

वाचा :-

१) **शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग मवैअ-१०१०/ ३९०/ प्रक्र-३६६/ सेवा-३ दिनांक-१९ जून, २०१०**
२) **शासन निर्णय क्रमांकः** नियोजन विभाग डोंविका २००९ / प्रक्र-६/ का-१४८३ दिनांक-१८ जानेवारी, २०१०
३) **सहसंचालक आरोग्य सेवा, मुंबई पत्र क्र.** संआसे/ कक्ष २अ /टे-२ /डोगरी तालुके/ प्रा.आ.के./ जा.क्र.१०२८/ १७, दि.२७.०४.२०१७

प्रस्तावना :-

कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर कार्यालय महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे (जलसंपदा विभाग) या कार्यालयाच्या अधिपत्याखाली कोयना प्रकल्प रुग्णालय, अलोरे, ता.चिपळुण जि. रत्नागिरी व कोयना प्रकल्प रुग्णालय कोयनानगर, ता.पाटण, जि.सातारा अशा दोन्ही रुग्णालयांचा राज्याच्या डोंगरी (दुर्गम) भागातील आरोग्य संस्थांत समावेश करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय नियोजन विभाग, क्रमांक डोंविका २००९ / प्रक्र-६/ का-१४८३ दिनांक १८ जानेवारी २०१० च्या अन्वये सातारा जिल्हयातील पाटण व रत्नागिरी जिल्हयातील चिपळूण हे दोन्ही तालुके पूर्णपणे डोंगरी तालुके म्हणून घोषित केलेले आहेत.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता कोयना प्रकल्प रुग्णालय, अलोरे, ता.चिपळुण जि. रत्नागिरी व कोयना प्रकल्प रुग्णालय कोयनानगर, ता.पाटण, जि.सातारा या दोन्ही आरोग्य संस्थांचा/ रुग्णालयांचा सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. मवैअ १०१०/ ३९०/ प्रक्र-३६६/ सेवा-३ दिनांक १९ जून

२०१० च्या शासन निर्णयान्वये घोषित केलेल्या आरोग्य संस्थांच्या यादीत दुर्गम भागातील आरोग्य संस्था म्हणून अंतर्भूत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२२१६५९००४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vithoba Kadam

Digitally signed by Arun Vithoba Kadam
DN: cn=Arun Vithoba Kadam, o=Mantralay, ou=PHD, email=arun.kadam@nic.in, c=US
Date: 2017.05.22 17:19:04 +05'30'

**(अ.वि.कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त,आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सह संचालक, आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
४. उपसंचालक,आरोग्य सेवा पुणे मंडळ,पुणे
५. जिल्हा शल्य चिकीत्सक, सातारा
६. अवर सचिव (सेवा-१/सेवा-२/ सेवा-३ / सेवा-५),
७. निवडनस्ती (आरोग्य-३अ).